राज्यातील गावठाण जमाबंदी प्रकल्प
राबविण्यासाठी निधी वितरीत करणेबाबत

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः गाजप्र-२०१९/प्र.क्र.१६६/पंरा-४

बांधकाम भवन ,२५ मर्झबानपथ,
फोर्ट,मुंबई-४०० ००१.
तारीख: १६ नोव्हेंबर,२०१९

**वाचा :**

**१) शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१७/प्र.क्र.१३/मातंक,दि.२२ फेब्रुवारी,२०१९.**
**२) शासन आदेश क्रमांकः संकीर्ण-२०१७/प्र.क्र.१३/मातंक,दि.२ मार्च,२०१९.**
**३) शासन आदेश क्रमांकः संकीर्ण-२०१७/प्र.क्र.१३/मातंक,दि.१२ एप्रिल,२०१९.**
**४) शासन आदेश क्रमांकः संकीर्ण-२०१७/प्र.क्र.१३/मातंक,दि.२२ एप्रिल,२०१९.**

**प्रस्तावना :**

राज्यातील गावठाण जमाबंदी प्रकल्प राबविण्याचा निर्णय या विभागाच्या दि.२२/०२/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये घेण्यात आला आहे. या योजनेसाठी स्वतंत्र लेखाशीर्ष नसल्यामुळे प्रथम टप्यात सदर कालावधीसाठी या योजनेकरिता निधी “लेखाशिर्ष ३४५१-सेक्रेटरीएट-आर्थिक सेवा-(०१)(०३)-ई गव्हर्नन्स प्रकल्पाची अंमलबजावणी १७ संगणक खर्च-(३४५१२८०८) मागणी क्रमांक एल-४ (योजनांतर्गत) (दत्तमत)" या लेखाशिर्षातंर्गत भागविण्यास मंत्रिमंडळाने मान्यता दिली आहे. या विभागाच्या दि. ०२ मार्च २०१९ रोजीच्या शासन आदेशान्वये गावठाण जमाबंदी प्रकल्पाच्या पहिल्या टप्याकरिता उपरोक्त लेखाशीर्षांतर्गत उपलब्ध रू.२,००,००,०००/- (अक्षरी रू. दोन कोटी )इतका निधी वितरित करण्यात आला आहे. तसेच दि. १२ एप्रिल, २०१९ रोजीच्या शासन आदेशान्वये सन २०१९-२० या आर्थिक वर्षात उपलब्ध निधीतुन रू.४,००,००,०००/- (अक्षरी रू.चार कोटी) तसेच दि.२२ एप्रिल,२०१९ रोजीच्या शासन आदेशान्वये सन २०१९-२० या आर्थिक वर्षात उपलब्ध निधीतुन रू.४,००,००,०००/- (अक्षरी रू.चार कोटी) इतका निधी कार्यालय अधिक्षक (लेखा), जमाबंदी आयुक्त व संचालक भूमी अभिलेख ,महाराष्ट्र राज्य, पुणे यांना अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर वितरित करण्यात आला आहे. गावठाण जमाबंदी प्रकल्पाचे काम सुरू झाले असुन जमाबंदी आयुक्त,पुणे यांचेकडून निधी

वितरीत करण्याची मागणी होत आहे.यास्तव या प्रकल्पासाठी तातडीने निधी उपलब्ध करून देणे आवश्यक आहे.

गावठाण जमाबंदी प्रकल्प (कार्यक्रम) या करिता लेखाशिर्ष मागणी क्रमांक एल-०३, २५१५,इतर ग्रामीण विकास कार्यक्रम,०० १०६,ग्रामीण भागात नागरी सुविधा निर्माण करणे,(००)(००)(०३) गावठाण जमाबंदी प्रकल्प(कार्यक्रम)(२५१५२५७५) या कार्यक्रमांतर्गत उपलब्ध निधीपैकी रु ३४.६८/- कोटी (अक्षरी रु.चौतीस कोटी अडुसष्ट लाख )इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

सन २०१९-२० या वर्षात गावठाण जमाबंदी प्रकल्प राबविण्यासाठी रु. ३४.६८/- कोटी (अक्षरी रु.चौतीस कोटी अडुसष्ट लाख )) इतका निधी कार्यालय अधिक्षक (लेखा), जमाबंदी आयुक्त व संचालक भूमी अभिलेख ,महाराष्ट्र राज्य, पुणे यांना अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर खर्चाचा तपशील सादर करण्याच्या अटीवर वितरित करण्यात येत आहे.

२. सदर खर्च "लेखाशिर्ष मागणी क्रमांक एल-०३, २५१५, इतर ग्रामीण विकास कार्यक्रम, ०० १०६, ग्रामीण भागात नागरी सुविधा निर्माण करणे, (००)(००)(०३) गावठाण जमाबंदी प्रकल्प(कार्यक्रम)(२५१५२५७५)" या लेखाशिर्षा अंतर्गत सन २०१९-२० या आर्थिक वर्षासाठी मंजूर निधीतून भागविण्यात यावा. सदरचा निधी ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आलेला आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावा.

३. कार्यालय अधिक्षक (लेखा), जमाबंदी आयुक्त व संचालक भूमी अभिलेख ,महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी या योजनेकरिता झालेल्या/होणाऱ्या खर्चाचा आढावा घेऊन महालेखापाल कार्यालयातील खर्चाशी ताळमेळ घेऊन त्यामध्ये तफावत राहणार नाही ,याबाबत दक्षता घेण्यात यावी. सदर अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल कार्यालयास सादर करावे व त्याची प्रत शासनास द्यावी.

४. राज्य शासनामार्फत वेळोवेळी प्रस्तुत योजनेविषयी व वित्त विषयक निर्गमित करण्यात आलेले विविध आदेश/नियम/शासन निर्णय /वित्तीय नियमावली यांची अंमलबजावणी करून वरील वितरीत तरतुदीचा विनियोग करण्याच्या अधीन राहून उपरोक्त तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

५. सदरील शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१५७/का१४४४, दि.३/९/२०१९ अन्वये व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.३७३/२०१९/व्यय-१५, दि.११.०९.२०१९ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदरचा निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१११६११०३४५८४२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAGHUNATH ANNASAHEB NAGARGOJE

Digitally signed by RAGHUNATH ANNASAHEB NAGARGOJE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=decff3a81eacee2237c8c2d29460e7c459d9f7baaab677f7578d952747d49ab2, postalCode=400001, street=RURAL DEVELOPMENT DEPT,BANDHKAM BHAVAN,25MARZBAN ROAD,FORT,MUMBAI, serialNumber=d404eac17c41303f055a321c8b78aa06691d96f89d2b59532f46b0d468148ae1, ou=RURAL DEVELOPMENT DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=RAGHUNATH ANNASAHEB NAGARGOJE
Date: 2019.11.16 14:37:15 +05'30'

**(र.आ.नागरगोजे)**

**उपसचिव,महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव,राजभवन,मलबार हिल, मुंबई.
२. प्रधान सचिव(ग्रा.वि.) यांचे स्वीय सहायक,बांधकाम भवन,मुंबई.
३. उ.स.(पं.रा.)व उ.स.(वित्त-१),ग्रामविकास विभाग,बांधकाम भवन,मुंबई.
४. महालेखापाल,(लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा),महाराष्ट्र-१/२,मुंबई/नागपूर
५. उप सचिव,(रोखशाखा),ग्रामविकास विभाग, मंत्रालय.मुंबई.
६. जमाबंदी आयुक्त तथा संचालक , भूमी अभिलेख , महाराष्ट्र राज्य, पुणे .
७. कार्यालय अधिक्षक (लेखा), जमाबंदी आयुक्त व संचालक भूमी अभिलेख , महाराष्ट्र राज्य, पुणे
८. कक्ष अधिकारी तथा आहरण व संवितरण अधिकारी (रोख शाखा), ग्रामविकास विभाग,मंत्रालय.मुंबई
९. नियोजन विभाग (का.१४४४ ),मंत्रालय,मुंबई.
१०. वित्त विभाग(व्यय-१५ व अर्थ-१७),मंत्रालय,मुंबई.
११. निवड नस्ती व बजेट नस्ती ( पंरा-४), ग्रामविकास विभाग , मंत्रालय,मुंबई